**सन २०१९-२० च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेसाठी राज्य शासनाचे अशंदान (अनिवार्य) वितरीत करुन खर्चास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०१९/प्र.क्र.१३५/२०१९/साशि-५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०२ मार्च, २०२०.

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि. ०८.०७.२०१९.

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मराग्रं-२०१९/प्र.क्र.१३५/२०१९/साशि-५, दि. ०७.११.२०१९.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि. २२.०१.२०२०.

४) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३१ /अर्थसंकल्पीत/२०१९-२०/१७३२०, दि.२८.०१.२०२०.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सांस्कृतिक कार्य विभागांतर्गत कार्यरत राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता यांचे अंशदान आणि राज्य शासनाचे अंशदान यांच्या संयुक्त सहभागाने (५० : ५०) समान निधी योजना राबविण्यात येते. या योजने अंतर्गत राज्यातील ग्रंथालयांना ग्रंथ, संगणक, झेरॉक्स मशीन, कपाटे, परिसंवाद व इमारत बांधकाम इ. बाबींवर खर्च करण्यासाठी निधी उपलब्ध करुन दिला जातो.

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेकरिता राज्य शासनाच्या अशंदानासाठी एकूण रुपये ३,००,००,००० /- ( अक्षरी रुपये तीन कोटी फ़क्त ) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि. ०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकातील तरतुदीनुसार या विभागाच्या संदर्भाधिन दि.०७.११.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेसाठी अर्थसंकल्पित निधीतील ६० टक्केच्या मर्यादेत रु.१,८०,००,०००/-( अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फ़क्त ) इतका निधी वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २२.०१.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये अनिवार्य खर्चाच्या बाबींची निधी वितरणाची मर्यादा ८० टक्के इतकी विहीत करण्यात आली आहे. त्यानुषंगाने ग्रंथालय संचालनालयाकडून प्राप्त संदर्भाधिन दि. २८.०१.२०२० रोजीच्या प्रस्तावास अनुसरुन प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेसाठी अर्थसंकल्पित निधीच्या ८०

टक्केच्या मर्यादेत उर्वरीत २० टक्के निधी म्हणजेच रु. ६०,००,०००/- ( अक्षरी रुपये साठ लक्ष फ़क्त ) इतका निधी वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय: -**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या योजनेकरिता राज्य शासनाच्या अशंदानासाठी एकूण रुपये ३,००,००,००० /- (अक्षरी रुपये तीन कोटी फ़क्त ) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या दि. २२.०१.२०२० रोजीच्या परिपत्रकानुसार अनिवार्य निधी खर्च करण्याची मर्यादा ८०% इतकी विहीत करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेसाठी राज्य शासनाच्या अशंदानासाठी अर्थसंकल्पित निधीच्या ८० टक्केच्या मर्यादेत उर्वरीत २० टक्के निधी म्हणजेच रु.६०,००,०००/- ( अक्षरी रुपये साठ लक्ष फ़क्त ) इतका निधी राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकात्ता यांचेकडे वितरीत करुन खर्चास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरचा निधी खर्च करण्यासाठी ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई यांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी कोषागारातुन निधी आहरीत करण्यापूर्वी शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.०८.०७.२०१९ अन्वये देण्यात आलेल्या सुचनांचे पालन करावे.

२. सदरचा खर्च "मागणी क्र. डब्ल्यु-४, २२०५, कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०२) राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानासाठी अंशदान ( अनिवार्य ) ( २२०५ ०३०४ ) ३२ - अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच या अनुदानाच्या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधीतांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. ०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकातील "३२-अशंदाने" यासाठी देण्यात आलेल्या तपासणी सूचीतील अटीची पूर्तता करण्यात आली आहे. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २२.०१.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांत निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००३०२१५५५२६५९०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatraya Rambhau Kahar

Digitally signed by Dattatraya Rambhau Kahar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc29789a0057acb8ed170e1748553c17db300239c347be5264afbff5eb51fcac, cn=Dattatraya Rambhau Kahar
Date: 2020.03.02 15:58:32 +05'30'

( द. रा. कहार )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४. राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकात्ता (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
५. ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई.
६. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय,मुंबई. (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
७. सचिव (उ.व.तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
८. कक्ष अधिकारी, साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती,साशि-५, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.